**प्राचार्य,अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र,**
**नागपूर या पदावर लष्करी अधिकाऱ्याची**
**कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रापोसे-१११५/प्र.क्र.८२/पोल-१(अ)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: १० जुलै, २०१५

वाचा - पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१/१०/४/प्राचार्य/ अअप्रकें/रिक्त पद/४२२/१२, दि. २५.०३.२०१५

**प्रस्तावना :-**

नागपूर सुराबर्डी येथील अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्रातील, "प्राचार्य" हे पद उन्नत करुन, "पोलीस उप महानिरीक्षक" या दर्जाचे करुन, सदर पदावर श्री. साहबीर सिंग जज, सेवानिवृत्त कर्नल यांची करार पध्दतीने, नियुक्ती करण्यात आली होती. श्री. साहबीर सिंग जज यांनी सदर पदाचा राजीनामा दिला आहे.

नक्षलवाद्यांनी अनेक वेळा जंगलामध्ये भूसुरूंग पुरुन ठेवलेले असतात. त्याचा मागोवा घेऊन ते निकामी करणे, अत्याधुनिक शस्त्रांत्रांचा वापर करणे, अचानक होणाऱ्या घातपाती हल्यांना तोंड देणे, जंगल युध्दाचे तंत्र आत्मसात करणे, यासाठी आधुनिक पध्दतीने प्रशिक्षण देणाऱ्या अधिकाऱ्याची अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्राकरीता आवश्यकता आहे. श्री. शमशेर सिंह, Retd. Colonel, Garhwal Rifles, श्री. सुमितकुमार, Ex. Dy. Commandant, BSF/NSG, श्री. प्रशांत आर जांबोळकर, DIGP, CRPF व श्री.एम. एच खोब्रागडे, Commandant, CRPF या चार लष्करी/निमलष्करी अधिकाऱ्यांनी प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर या पदावर काम करण्यास इच्छुकता दर्शविली होती. प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर या पदाकरीता सुयोग्य अधिकाऱ्याची निवड करण्याकरीता विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली एक छाननी समिती स्थापन करण्यात आली होती. सदर छाननी समितीने, सेवानिवृत्त कर्नल श्री. शमशेर सिंह यांचा पूर्वीचा सैन्य दलातील कामाचा अनुभव त्याचप्रमाणे त्यांनी गडचिरोली जिल्हयातील केंद्रिय राखीव पोलीस दलातील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण दिले असल्याने, सदर कामाचा त्यांच्या अनुभव विचारात घेऊन निवड समितीने प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर या पदाकरीता त्यांच्या नावाची शिफारस केली आहे.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. सीबीई-१८९३/प्र.क्र.३८/९३/तेरा, दि. १५.०२.१९९५ मध्ये शासकीय अधिकारी / कर्मचारी व विविध क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींना करार पध्दतीने नियुक्ती देण्याबाबत तरतुद आहे. तसेच, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरईएम-१५०९/प्र.क्र.५८/२००९/१३, दि. १४.०१.२०१० अन्वये मा. उच्च न्यायालयाने, रिट पिटीशन क्र.८५/२००८ प्रकरणी दिलेल्या आदेशाचा अवमान होणार नाही, याची दक्षता घेण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सेवानिवृत्त कर्नल श्री. शमशेर सिंह यांचा पूर्वीचा सैन्य दलातील कामाचा अनुभव, त्याचप्रमाणे त्यांनी गडचिरोली जिल्हयातील केंद्रिय राखीव पोलीस दलातील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण दिले असल्याने, सदर कामाचा त्यांचा अनुभव विचारात घेऊन, प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर या पदाकरीता २ वर्षाकरीता त्यांना कंत्राटी तत्वावर नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. सेवानिवृत्त कर्नल श्री. शमशेर सिंह यांची "प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१००/ग्रेड वेतन रु.६६००) या पदावर २ वर्षाकरीता किंवा ते कार्यरत असेपर्यंत, यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीकरीता करार पध्दतीने नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर नियुक्ती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीबीई-१८९३/प्र.क्र.३८/९३/तेरा, दि.१५.०२.१९९५ मधील परिश्रामिकासंदर्भातील तरतुद शिथिल करून करण्यात येत आहे.

३. श्री. शमशेर सिंह, सेवानिवृत्त कर्नल यांना प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर या पदाचे वेतन वजा त्यांना मिळत असलेले निवृत्तीवेतन अशी जी एकूण रक्कम येईल ती रक्कम परिश्रामिक म्हणून त्यांना देण्यात येईल. याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ मधील नियम १५७, त्याचप्रमाणे शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.सेनिवे-२०१४/प्र.क्र.९९/सेवा-४, दि.१६.१०.२०१४ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. याबाबत होणार खर्च "मागणी क्रमांक बी-०१, २०५५-पोलीस-१०९-जिल्हा पोलीस १०९ (००) (०१) वेतन (२०५५ ०१६८)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सेवानिवृत्त कर्नल श्री. शमशेर सिंह यांच्याकडून पोलीस दलातील जास्तीत जास्त अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षित करुन घेण्याची जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची राहील. त्यादृष्टीने सेवानिवृत्त कर्नल श्री. शमशेर सिंह यांच्याशी विचारविनिमय करुन आवश्यक ती कार्यपध्दती/सूचना, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी निर्गमित कराव्यात.

६. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांचे अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे क्र.८३/२०१५/तेरा, दि.२४.०४.२०१५ व क्र.२४७/सेवा-७, दि.१७.०६.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२७१३०४३६४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: CN = Charushila Chandrakant Tambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.07.10 19:03:43 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रत,

- महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
- मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
- मा. राज्यमंत्री (गृह) (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
- मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
- अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

- जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
- संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत).
- प्राचार्य, अपारंपारिक अभियान प्रशिक्षण केंद्र, नागपूर
- सामान्य प्रशासन विभाग (का-१३), मंत्रालय, मुंबई
- वित्त विभाग (का-सेवा-७), मंत्रालय, मुंबई
- निवडनस्ती / पोल-१(अ).